**महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ (वेतनस्तर एस-२०) संवर्गातील अधिकाऱ्यांच्या पदस्थापना/बदली याबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारशी करण्यासाठी नागरी सेवा मंडळ स्थापन करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः मवैअ-२०२३/प्र.क्र. ३३८(२)/सेवा-३

गो.ते. रूग्णालय आवार, १० वा मजला
मंत्रालय, मुंबई - ४०० ००१
तारीख: ११ मे, २०२३

**वाचा -**

१) शासन निर्णय क्रमांक सा.प्र.वि. , एसआरव्ही-२०१४/प्र.क्र. २६/१२, दि. ३१.०१.२०१४
२) शासन निर्णय क्रमांक सा.आ.वि., एसआरव्ही-१०१६/प्र.क्र. ३२५/सेवा-२, दि. ०३.०४.२०१४
३) शासन निर्णय क्रमांक सा.आ.वि., एसआरव्ही-१०१६/प्र.क्र. ३२५/सेवा-२, दि. १७.०४.२०१७
४) शासन अधिसूचना क्र, सा.आ.वि., मवैअ-२०२३/प्र.क्र. ३३८(१)/सेवा-३, दि. ११.०५.२०२३

**प्रस्तावना**

मा. सर्वोच्च न्यायालय यांनी रिट पिटीशन (सिव्हील) क्र.८२/२०११ मध्ये दिनांक ३१.१०.२०१३ रोजी दिलेल्या न्यायनिर्णयानुसार, शासन सेवेतील गट-अ, गट-ब व गट-क मधील अधिकारी / कर्मचाऱ्यांच्या पदस्थापना व बदली याबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारसी करण्यासाठी, दिनांक ३१.०१.२०१४ च्या शासन निर्णयान्वये दिलेल्या निर्देशास अनुसरून, संदर्भाधीन क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ, गट-ब (राजपत्रित व सामान्य राज्य सेवा गट-अ गट-ब (राजपत्रित) संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदली / पदस्थापना याबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारसी करण्यासाठी नागरी सेवा मंडळ (१) ची स्थापना करण्यात आली आहे.

वाचा क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ संवर्गातील अधिकाऱ्यांच्या सरळसेवेने/पदोन्नतीने पदस्थापना तसेच बदली याबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारशी करण्यासाठी संदर्भाधिन क्र. २ येथील शासन निर्णयान्वये स्थापन करण्यात आलेल्या नागरी सेवा मंडळ (१) मध्ये सुधारणा करण्यात आली आहे. आता, संदर्भ क्र. ४ येथील अधिसूचनेन्वये मा. मंत्री, सार्वजनिक आरोग्य यांना

प्रदान करण्यात आलेले सर्वसाधारण बदल्यांचे अधिकार (वैद्यकीय अधिकारी, गट-अ वेतनस्तर एस-२०) फक्त सन २०२३ या वर्षासाठी आयुक्त, आरोग्य सेवा, मुंबई यांना प्रत्यार्पीत करण्यात आलेले आहेत. या अनुषंगाने महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ (वेतनस्तर एस-२०) या संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदलीबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारशी करण्यासाठी फक्त सन २०२३ या वर्षासाठी नागरी सेवा मंडळ स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ (वेतनस्तर एस -२०) संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदल्यांसाठी फक्त सन २०२३ या वर्षासाठी नागरी सेवा मंडळ स्थापन करण्यात येत असून, नागरी सेवा मंडळाची रचना पुढीलप्रमाणे करण्यात येत आहे

| | | |
|---|---|---|
| १ | आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई | अध्यक्ष |
| २ | संचालक-१, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई | सदस्य |
| ३ | संचालक-२, आरोग्य सेवा आयुक्तालय, पुणे | सदस्य |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०४१०२०५६२८६४१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

AVINASH SARDAR JADHAV

Digitally signed by AVINASH SARDAR JADHAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=77e749a5820964d03e94305adeb0ee2ffb2c5f02efc5b019e8b49dc59175a25c, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AA8FDCAA7AE61AB4BED501E19D794BD7197874F2989B98780B1607ADCBDFE844, cn=AVINASH SARDAR JADHAV
Date: 2023.05.11 17:17:37 +05'30'

**(अ.स. जाधव)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) मा. राज्यपाल यांचे सचिव
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य
४) मा. मंत्री (सा.आ.) यांचे खाजगी सचिव

५) अपर मुख्य सचिव (सा.आ.) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
६) सचिव (२) (सा.आ.) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
७) आयुक्त, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई
८) संचालक, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई
९) सहसंचालक/उपसंचालक, आारोग्य सेवा (सर्व)
१०) सर्व जिल्हा शल्यचिकित्सक/ जिल्हा आरोग्य अधिकारी
११) सर्व सह सचिव/उप सचिव, सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई
१२) अवर सचिव (कार्यासन-१२), सा.प्र.वि., मंत्रालय, मुंबई
१३) निवडनस्ती (सेवा-३)